टंचाई/नैसर्गिक आपत्ती सन २०२३-२४ या चालू वित्तीय वर्षासाठी नियंत्रण अधिकाऱ्यांकडे अनुदान सुपूर्द करणे.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन, आ.व्य.प्रभाग),**
**शासन निर्णय क्र. एससीवाय-०४/२०२३/प्र.क्र.२९ /म-११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - १८ एप्रिल, २०२३

<u>वाचा</u>:- १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र सीएफएल-२०१२/प्र.क्र.१५७/म-३, दि.१०.०१.२०१४
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र सीएलएस-२०२२/प्र.क्र.३४९/म-३, दि.२७.३.२०२३
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि .१२.०४.२०२३

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्राच्या एकत्रित निधीमधून २०२३-२४ या वित्तीय वर्षात काही रकमा काढून घेण्यास शासनाला प्राधिकृत करणारा "महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०२३" मंजूर झाला असून तो सन २०२३ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक १७ म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्रात असाधारण भाग-४ मध्ये दिनांक २९ मार्च, २०२३ रोजी प्रसिध्द झाला आहे. त्यानुसार तातडीच्या बाबींसाठी १० टक्के निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यात कोणत्याही वेळी कोणती नैसर्गिक आपत्ती येईल याचा अंदाज करणे कठीण असते. राज्यात नैसर्गिक आपत्ती घडून काही व्यक्ती दगावल्यास त्यांच्या वारसांना तातडीने मदत उपलब्ध व्हावी. तसेच घरांची पडझड होऊन झालेले नुकसान, मृत जनावरांऐवजी पशुधन खरेदी यासाठी त्वरीत निधी उपलब्ध व्हावा याकरिता नैसर्गिक आपत्ती निवारणासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीतून सर्व विभागीय आयुक्तांना त्या-त्या लेखाशिर्षांतर्गत सोबतच्या प्रपत्रात नमूद केल्याप्रमाणे एक तातडीची बाब म्हणून या शासन निर्णयाद्वारे निधी मंजूर करण्यात येत आहे.

२. शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक १२.४.२०२३ अन्वये सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील निधी वितरणाबाबतच्या मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. सदर परिपत्रकानुसार या आर्थिक वर्षाच्या पहिल्या तिमाहीसाठी वार्षिक तरतूदीच्या २० टक्के निधी बीम्स प्रणालीवर वितरीत करण्यात येणार आहे. त्यानुसार सद्यस्थितीत बीम्स प्रणालीवर उपलब्ध करून देण्यात आलेला १० टक्के निधी रु.५६८.२९ लक्ष (अक्षरी रुपये पाच कोटी अडूसष्ट लाख एकोणतीस हजार फक्त), मागणी क्र.सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्ती निवारणार्थ सहाय्य, ०२ पूर चक्रीवादळे इ. (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च या लेखाशिर्षांतर्गत सोबतच्या प्रपत्र-अ मध्ये नमूद केल्यानुसार सर्व विभागीय आयुक्त यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. उर्वरित १० टक्के निधी वित्त विभागाकडून उपलब्ध करून घेण्यात आल्यानंतर वितरीत करण्यात येईल. निधी वितरीत करताना संदर्भाधीन क्र.३ येथे नमूद परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या सुचनांचे पालन करण्यात यावे.

४. मदतीचे वाटप त्या-त्या वेळी शासनाने घेतलेल्या निर्णयानुसार व त्या निर्णयानुसार मध्ये उदधृत केलेल्या शासन निर्णयातील अटी/शती व कार्यपध्दतीनुसार करण्यात यावे, या मदत वाटपाचे लेखे, अभिलेख/नोंदवह्या विहित कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत करणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात यावेत. विहित कार्यपध्दतीनुसार केलेल्या नुकसानीच्या पंचनाम्यानुसार येणारी रक्कम व प्रचलित आदेशानुसार देय होणारी मदतीची रक्कम यापेक्षा जी रक्कम कमी असेल ती संबंधितास वाटप करण्यात यावी.

५. खर्चावर पूर्ण नियंत्रण रहावे म्हणून नियंत्रक अधिकाऱ्यांनी (विभागीय आयुक्त) त्यांच्याकडे सुपुर्द करण्यात आलेले अनुदान पुर्णपणे जिल्हाधिकाऱ्यांकडे वितरीत न करता ज्या जिल्ह्याला निधीची आवश्यकता आहे अशा जिल्ह्यांना वितरीत करावे. जिल्हाधिकाऱ्यांना दिलेले अनुदान त्यांनी बऱ्याच अंशी प्रत्यक्ष खर्च केल्याशिवाय त्यांच्या जादा अनुदान मागणीचा विचार करु नये. तसेच शासनाकडे जादा अनुदानाची मागणी करण्यापूर्वी विभागीय आयुक्तांनी वितरीत केलेल्या अनुदानाचे पुर्नवाटप करावे. तसेच अधिक तरतूदीची मागणी करतांना संबंधित जिल्हाधिकाऱ्यांकडून मागणी केलेली संपूर्ण तरतूद खर्च होऊ शकेल, अशा तऱ्हेचे प्रमाणपत्र घ्यावे. तसेच अतिरिक्त लागणाऱ्या अनुदानासाठी खुलासेवार कारणे नमूद करावीत. त्याचप्रमाणे या विभागाला प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपयंत आधीच्या महिन्यातील मासिक खर्चाचे विवरणपत्र न चुकता पाठवावे.

६. अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध निधी अनावश्यक रितीने कोषागारात आहरीत करुन तो वाटपा अभावी बँकेत पडून राहणार नाही, याची काटेकोर दक्षता घेण्याचे आदेश वेळोवेळी देण्यात आलेले आहेत. असे असतानाही कोषागारातून रक्कम आहरीत करुन बँकेत ठेवले असल्याच्या बाबी निदर्शनास आल्या आहेत. यास्तव निधी आहरीत करुन बँकेत ठेऊ नये, अशा सूचना या शासन निर्णयान्वये पुन:श्च देण्यात येत आहेत. अशी बाब आढळून आल्यास त्याला तात्पुरता अपहार समजून संबंधितांवर शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल याची सर्वांनी नोंद घ्यावी.

७. नियंत्रक अधिकाऱ्यांनी अनुदान वाटपाची एक प्रत सचिव (मदत व पुनर्वसन) यांना न चुकता सादर करावी. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागार/उपकोषागार यांच्याकडे पाठविण्यात येणाऱ्या बिलासोबत जोडल्या जाणाऱ्या संगणक चिठ्ठीमध्ये गौण/उपशिर्षाच्या "संगणक यंत्र" संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा, असे आदेश कृपया संबंधित अधिकाऱ्यांना नियंत्रण अधिकाऱ्यांनी दयावेत. तसेच कोषागार/उपकोषागातून आहरित केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा.

८. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेल्या निधीतून दरमहा करण्यात आलेल्या खर्चाचा तपशील केंद्र शासनाने तयार केलेल्या www.ndmis,mhagov.in या प्रणालीमध्ये संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी भरावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४१८१६५६१९९३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY AUDUMBAR DHARURKAR

Digitally signed by SANJAY AUDUMBAR DHARURKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RELIEF AND REHABILITATION DEPARTMENT, 2.5.4.20=637145fd393d6d5c713e94e6da7bc6bee23011448b7fc64d138630b9c76ae7a2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FCF7172A73579B34FA622983D8FB647780FBEF1D35A1CA975955EB9193F3F800, cn=SANJAY AUDUMBAR DHARURKAR
Date: 2023.04.20 11:57:15 +05'30'

**( संजय धारूरकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) विभागीय आयुक्त (सर्व),
२) जिल्हाधिकारी (सर्व),
३) महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षण), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
४) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई-४०० ०२३,
५) अधिदान व लेखाधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१,
६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
७) कार्यासन अर्थ-३/व्यय-९,वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,३२
८) निवडनस्ती, कार्यासन म-११, महसूल वन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.

## प्रपत्र-अ

महसूल व वन विभाग,शासन निर्णय क्र. एससीवाय-०४/२०२३/प्र.क्र.२९ /म-११, दि.१८.४.२०२३ नुसार विभागीय आयुक्त यांना खालील लेखाशिर्षांतर्गत वितरीत करावयाच्या निधीचे विवरपत्र

| अ. क्र. | उप प्रधानशिर्ष/उपशिर्ष/गौणशिर्ष/ संगणक सांकेताक मुख्य लेखाशिर्ष मागणी क्र.सी-६ २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य | नियंत्रण अधिकारी | एकूण वितरीत करावयाचा निधी ( अर्थसंकल्पीय तरतूदीच्या २० टक्के) हजारात | वितरीत निधी ( अर्थसंकल्पीय तरतूदीच्या १० टक्के) (रु.हजारात) |
|---|---|---|---|---|
| १. | ०२ पूर चक्रीवादळे इ. १०१ अनुग्रह सहाय्य, (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१) (०१) रोख भत्ता, मृत व्यक्तीच्या कुटुंबियांना सहाय्य व जखमींना मदत, ३१ सहायक अनुदाने ( वेतनेतर) ( २२४५ ०१५५) | विभागीय आयुक्त, नाशिक | ११६६६.००० | ५८३३.००० |
| | | विभागीय आयुक्त, पुणे | ११६६६.००० | ५८३३.००० |
| | | विभागीय आयुक्त, नागपूर | ११६६६.००० | ५८३३.००० |
| | | विभागीय आयुक्त, कोकण | ११६६६.००० | ५८३३.००० |
| | | विभागीय आयुक्त, औरंगाबाद | ११६६६.००० | ५८३३.००० |
| | | विभागीय आयुक्त, अमरावती | ११६६६.००० | ५८३३.००० |
| | | **एकूण** | **६९९९६.०००** | **३४९९८.०००** |
| २. | ०२ पूर चक्रीवादळे इ. ११७ पशुधन खरेदीसाठी शेतकऱ्यांना सहाय्य, (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१) (०१) मृत जनावरांऐवजी पशुधन खरेदीसाठी अल्प व अत्यल्प भूधारक शेतकऱ्यांना सहाय्य, ३१ सहायक अनुदाने ( वेतनेतर) ( २२४५ ०३१५) | विभागीय आयुक्त, नाशिक | १०६५.००० | ५३२.५०० |
| | | विभागीय आयुक्त, पुणे | १०६५.००० | ५३२.५०० |
| | | विभागीय आयुक्त, नागपूर | १०६५.००० | ५३२.५०० |
| | | विभागीय आयुक्त, कोकण | १०६५.००० | ५३२.५०० |
| | | विभागीय आयुक्त, औरंगाबाद | १०६५.००० | ५३२.५०० |
| | | विभागीय आयुक्त, अमरावती | १०६५.००० | ५३२.५०० |
| | | **एकूण** | **६३९०.०००** | **३१९५.०००** |
| ३. | ०२ पूर चक्रीवादळे इ. १०१ अनुग्रह सहाय्य, (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१) (०४) इतर बाबी, ३१ सहायक अनुदाने ( वेतनेतर) ( २२४५ ०२४४) | विभागीय आयुक्त, नाशिक | ५३.००० | २६.५०० |
| | | विभागीय आयुक्त, पुणे | ५३.००० | २६.५०० |
| | | विभागीय आयुक्त, नागपूर | ५३.००० | २६.५०० |
| | | विभागीय आयुक्त, कोकण | ५३.००० | २६.५०० |
| | | विभागीय आयुक्त, औरंगाबाद | ५३.००० | २६.५०० |
| | | विभागीय आयुक्त, अमरावती | ५३.००० | २६.५०० |
| | | **एकूण** | **३१८.०००** | **१५९.०००** |
| ४. | ०२ पूर चक्रीवादळे इ. १०१ अनुग्रह सहाय्य, (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१) (०२) राहत केंद्रामध्ये निवारा, अन्न, वस्त्र, औषधे, इत्यादींचा पुरवठा, ३१ सहायक अनुदाने ( वेतनेतर) ( २२४५ ०२१७) | विभागीय आयुक्त, नाशिक | २७६.००० | १३८.००० |
| | | विभागीय आयुक्त, पुणे | २७६.००० | १३८.००० |
| | | विभागीय आयुक्त, नागपूर | २७६.००० | १३८.००० |
| | | विभागीय आयुक्त, कोकण | २७६.००० | १३८.००० |
| | | विभागीय आयुक्त, औरंगाबाद | २७६.००० | १३८.००० |
| | | विभागीय आयुक्त, अमरावती | २७६.००० | १३८.००० |
| | | **एकूण** | **१६५६.०००** | **८२८.०००** |
| ५. | ०२ पूर चक्रीवादळे इ. ११३ घरांची दुरूस्ती / पुनर्बांधणी यासाठी सहाय्य, (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१) (०१) दुरूस्ती / पुनर्बांधणी यासाठी सहाय्य, ३१ सहायक अनुदाने ( वेतनेतर) ( २२४५ ०२७१) | विभागीय आयुक्त, नाशिक | ५८८३.००० | २९४१.५०० |
| | | विभागीय आयुक्त, पुणे | ५८८३.००० | २९४१.५०० |
| | | विभागीय आयुक्त, नागपूर | ५८८३.००० | २९४१.५०० |
| | | विभागीय आयुक्त, कोकण | ५८८३.००० | २९४१.५०० |
| | | विभागीय आयुक्त, औरंगाबाद | ५८८३.००० | २९४१.५०० |
| | | विभागीय आयुक्त, अमरावती | ५८८३.००० | २९४१.५०० |
| | | **एकूण** | **३५२९८.०००** | **१७६४९.०००** |

**************************